**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : टिएसपी-१०९५/प्र.क्र.६/कार्यासन-६,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक : २२ जून, १९९५.**

**वाचा :**
१) शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग क्रमांक एमआयएस-१०९४/प्र.क्र.६०/कार्यासन-५, दिनांक २०.४.१९९४.
२) शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग क्रमांक एमआयएस-१०९४/प्र.क्र.६०/कार्यासन-५, दिनांक २६.५.१९९४.
३) शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग क्रमांक टिएसपी-१०९५/प्र.क्र.६/कार्यासन-६, दिनांक २६.४.१९९५.
४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक टिडीसी- १६९२/ प्र.क्र.४०७७/का.३, दिनांक २९.६.१९९५.

**प्रस्तावना :-** महाराष्ट्रातील डोंगराळ व वन प्रदेशात विविध जमातींच्या आदिवासींची लोकसंख्या ब-याच मोठया प्रमाणात आहे. पुढारलेल्या समाज घटकांशी संपर्क ठेवण्यातील बुजरेपणा, मागासलेपणा, अंधश्रध्दा, दारिद्रय, अशिक्षितपणा इत्यादी बाबी आदिवासींमध्ये आढळून येतात. परिणामी, शिक्षण, पौष्टिक आहार, आरोग्य विषयक सेवा, वर्षभर पुरेल एवढा रोजगार इत्यादी जीवनावश्यक गोष्टी त्यांना वेळीच उपलब्ध होत नाहीत म्हणून आदिवासींचे जीवनमान निकृष्ट पातळीवर राहिलेले आहे. तसेच स्थानिक पातळीवर रोजगार उपलब्ध होत नसल्यामुळे आदिवासींना स्थलांतर करण्याशिवाय पर्याय नसतो. अशा गंभीर बाबींचे प्रमाण कमी व्हावे किंबहुना टाळता यावे याकरिता शासनामार्फत अनेक योजना कार्यरत आहेत. परंतु या सर्व योजनांच्या अंमलबजावणीमध्ये एकसूत्रीपणा व प्रभावीपणा येण्याकरिता सर्व घटक कार्यक्रमांना एकत्र करुन एक विशेष कृती कार्यक्रम राबविण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे. हा सर्वव्यापी कार्यक्रम नवसंजीवन योजना या नावाने अंमलात आणावा असे शासनाने ठरविले आहे.

**शासन निर्णय :-** प्रस्तावनेत नमूद करण्यात आलेल्या बाबींच्या पार्श्वभूमीवर शासनाने नवसंजीवन योजना राबविण्याचे ठरविले असून त्याचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

(१) योजनेचा उद्देश :- आदिवासींच्या आरोग्यात सुधारणा करणे, त्यांना आरोग्य विषयक पुरविणे, विविध रोजगार कार्यक्रमांतर्गत वर्षभर पुरेल एवढा रोजगार उपलब्ध करुन देणे, आदिवासींना पिण्याचे शुध्द व पुरेसे पाणी उपलब्ध करुन देणे, अन्न-धान्य पुरवठा सुनिश्चित करुन पूरक आहार देणे आणि या सर्व उपाययोजनांव्दारे आदिवासींचे क्रियाशील आयुष्य वाढविणे, हा या नवसंजीवन योजनेचा प्रमुख उद्देश आहे.

(२) योजनेची व्याप्ती :- ही योजना महाराष्ट्र राज्याच्या संपूर्ण आदिवासी उपयोजना क्षेत्रामध्ये राबविण्यात येईल. यामध्ये अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्र, माडा व मिनी माडा क्षेत्राचा समावेश आहे.

(३) <u>योजनेची अंमलबजावणी</u> :- नवसंजीवन योजना राज्यात दिनांक ०१ मे, १९९५ पासून सुरु करण्यात आली आहे.

(४) <u>योजनेचे स्वरुप</u> :- नवसंजीवन योजनेमध्ये अंतर्भूत करण्यात आलेल्या घटक योजना पुढील प्रमाणे आहेत.

१) <u>रोजगार विषयक कार्यक्रम</u>
- (अ) रोजगार हमी योजना
- (आ) जवाहर रोजगार योजना (पहिला उद्‌भव)
- (इ) जवाहर रोजगार योजना (दुसरा उद्‌भव)
- (ई) आश्वासित रोजगार योजना

२) <u>आरोग्य सेवा</u>
- (अ) प्राथमिक आरोग्य सेवा पुरविणे
- (आ) शुध्द पिण्याच्या पाण्याचा पुरवठा

३) <u>पोषण विषयक कार्यक्रम</u>
- (अ) एकात्मिक बालविकास योजना
- (आ) शालेय पोषण आहार योजना

४) <u>धान्य पुरवठा</u>
- (अ) स्वस्त धान्य दुकानामार्फत शिधावाटप
- (आ) बळकटीकृत सार्वजनिक वितरण व्यवस्था (रिव्हॅम्प्ड पब्लिक डिस्ट्रीब्युशन सिस्टम)
- (इ) पर्जन्यपूर्व साठवण (प्री मान्सून स्टॉकिंग)
- (ई) व्दार वितरण व्यवस्था

५) <u>खावटी कर्ज योजना</u>

६) <u>धान्य कोष योजना</u>

(५) <u>योजनेची कार्यपध्दती</u> :- आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत असलेल्या जिल्हयांचे जिल्हाधिकारी हे नवसंजीवन योजनेचे मुख्य अंमलबजावणी अधिकारी म्हणून काम पाहतील. जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी, अपर आयुक्त, आदिवासी विकास, जिल्हा आरोग्य अधिकारी आणि प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प या सर्व अधिका-यांचा ही योजना राबविण्यामध्ये सक्रीय सहभाग राहील व ते ही योजना यशस्वी होण्यासाठी जबाबदार राहतील.

(६) <u>संवेदनशील क्षेत्र निवडण्याचे निकष</u> :- ही योजना प्रभावीपणे राबविण्यासाठी जिल्हाधिका-यांनी खालील निकषांवर आधारित आपल्या जिल्हयांतील संवेदनशील क्षेत्र निवडावे :-
- (अ) अतिदुर्गम म्हणून या पूर्वी घोषित करण्यात आलेली गांवे,
- (आ) ज्या गांवात, पाडयात अथवा क्षेत्रात या आधी कुपोषणाचे दुर्धर प्रसंग ओढविलेले आहेत अशी गांवे, पाडे अथवा क्षेत्रे,
- (इ) पावसाळयात ज्यांची संपर्क व्यवस्था विस्कळीत होते अशी गांवे,
- (ई) ज्या गावी शुध्द व स्वच्छ पिण्याच्या पाण्याची सोय उपलब्ध नाही अशी गावे,
- (उ) प्राथमिक आरोग्य केंद्रे व किंवा उपकेंद्रे यापासून दूर अंतरावर असलेली गावे,

(ऊ) ज्या गावातील स्वस्त धान्य दुकाने कार्यरत नाहीत अथवा असे दुकान दूर अंतरावर आहे अशी गावे,

(ए) ज्या गावात पावसाळयात रोजगार पुरविणे दुरापास्त होऊन बसते अशी गावे,

(ऐ) ज्या गांवात अंगणवाडयांची/मिनी अंगणवाडयांची सोय नाही अशी गावे.

(७) कृति नियोजन आराखडा :- वरील निकषानुसार क्षेत्र निश्चित केल्यानंतर जिल्हा अधिका-यांनी त्यांच्या जिल्हयातील सर्व आदिवासी क्षेत्रात सध्या कार्यरत असलेले सर्व घटक कार्यक्रम समन्वित त-हेने राबविणे सहज साध्य होण्यासाठी सविस्तर कृती नियोजन आराखडा तात्काळ तयार करावा आणि त्यानुसार करण्यात आलेल्या कार्यवाहीचा प्रत्येक महिन्याला त्यांनी सविस्तर आढावा घ्यावा. कृति नियोजन आराखडा तयार करतांना जिल्हाधिका-यांनी पुढील मार्गदर्शक तत्वांचे काटेकोरपणे पालन करावे :-

(१) रोजगार कार्यक्रम

(एक) आदिवासींचे उन्हाळी दिवसांत होणारे स्थलांतर टाळण्यासाठी स्थानिक पातळीवर पुरेसा रोजगार उपलब्ध करुन घ्यावा किंवा आवश्यकतेनुसार नवीन रोजगाराची कामे मंजूर करण्याची दक्षता घ्यावी.

(दोन) रोजगार विषयक कार्यक्रमाखाली आदिवासी क्षेत्रात पुरेसा निधी उपलब्ध आहे किंवा कसे याची खात्री करण्यात यावी व प्रत्येक निवडक क्षेत्रात आवश्यक तेवढी कामे मंजूर केली जातील याची सर्वतोपरी दक्षता घ्यावी.

(तीन) आदिवासी मजूरांना द्यावयाची मजूरी ही १० दिवसांत देण्यात यावी व कोठेही देयके प्रलंबित राहाणार नाहीत याची खात्री करावी.

(२) आरोग्य विषयक कार्यक्रम

(एक) आरोग्य सेवे अंतर्गत आता आदिवासी भागात आरोग्य केंद्र, उपकेंद्रे व फिरती आरोग्य पथके स्थापन करण्यात आलेली आहेत. त्यामधील वैद्यकीय अधिकारी आणि कर्मचारी यांची सर्व मंजूर पदे भरली आहेत किंवा कसे याची तात्काळ पाहाणी करण्यात यावी. काही रिक्त पदे आढळून आल्यास ती त्वरित भरली जातील याची दक्षता घेण्यात यावी. आवश्यकता भासल्यास बिगर आदिवासी क्षेत्रामधून वैद्यकीय अधिकारी अथवा कर्मचारी यांना प्रतिनियुक्तीवर आदिवासी क्षेत्रात नेमणूका द्याव्यात. नियुक्त केलेले वैद्यकीय अधिकारी/कर्मचारी नियुक्त जागी कार्यरत राहातील याची दक्षता घेण्यात यावी. तसेच आरोग्य संस्थांकडे वाहने ( जीप रुग्णवाहिका इ.) उपलब्ध आहेत व सुस्थितीत आहेत. या विषयी आढावा घेऊन खात्री करण्यात यावी. प्रत्येक आरोग्य केंद्रामध्ये औषधांचा साठा, वैद्यकीय उपकरणांचा गरजेनुसार साठा उपलब्ध आहे याची देखील खात्री करण्यात यावी. पावसाळयाआधी सर्व वैद्यकीय अधिका-यांनी आदिवासी गावे, पाडे इत्यादींना प्रत्यक्ष भेटी देऊन आदिवासींची आरोग्य तपासणी केली पाहिजे. तपासणीअंती प्रतिबंधक तसेच उपचारात्मक औषध योजना त्वरीत केली पाहिजे.

(दोन) आदिवासी क्षेत्रात उपलब्ध असलेल्या पिण्याच्या पाण्याचा साठा निर्जंतुक करण्यासाठी जंतुनाशक पावडरचा वापर करुन पिण्याचे पाणी स्वच्छ व निर्जंतुक करणे आवश्यक आहे. ही जबाबदारी प्रामुख्याने ग्रामपंचायतीची असली तरीही यासंबंधात सार्वजनिक आरोग्य विभागाने

संपूर्ण काळजी घ्यावी. दूषित पाण्याची तात्काळ तपासणी करुन त्यांचे नमूने लवकरात लवकर तपासण्यात यावे. हे काम वेळच्या वेळी केले जात आहे किंवा कसे याबद्दल जिल्हाधिकारी यांनी सतर्क असणे अत्यंत गरजेचे आहे.

(३) पोषण आहार

(एक) आदिवासी क्षेत्रातील जिल्हा परिषदेच्या सर्व प्राथमिक शाळांमधून वर्ग-१ ते ४ मधील विद्यर्थ्यांना दूध किंवा स्थानिक पूरक आहाराचा पुरेसा पुरवठा करण्यात येतो. याबाबत काटेकोरपणे संनियंत्रण ठेवण्यात यावे.

(दोन) प्रत्येक अंगणवाडी/मिनी अंगणवाडीवर पूरक आहाराचा पुरवठा नियमितपणे व्हावा तसेच आहाराचा साठा कमी पडत असल्यास, आवश्यक तेवढा साठा वेळीच उपलब्ध करुन द्यावा अथवा स्थानिक पूरक आहार त्वरीत उपलब्ध करुन देण्यात यावा.

(तीन) अंगणवाडयांना वैद्यकीय अधिका-यांनी वेळापत्रकाप्रमाणे नियमित भेटी देऊन सर्व मुलांची तसेच गर्भवती महिला व नुकत्याच बाळंत झालेल्या महिलांची आरोग्य तपासणी करावी.

(४) आदिवासी क्षेत्रात धान्य पुरवठा

(एक) आदिवासी क्षेत्रातील सर्व स्वस्त धान्य दुकाने कार्यरत आहेत आणि त्यामध्ये पुरेसा धान्याचा साठा आहे याची खात्री करुन घेण्यात यावी.

(दोन) भारत सरकारच्या बळकटीकृत सार्वजनिक वितरण व्यवस्थेंतर्गत आदिवासी उपयोजना क्षेत्रात धान्य पुरवठा सुरळीतपणे पोहोचविणे महत्वाचे आहे. याकरिता आवश्यक ती काळजी घेण्यात यावी.

(तीन) धान्याचा साठा गोडाऊन मधून उचलून तो परस्पर बाजारात विकण्याच्या स्वस्त धान्य दुकानदारांच्या अपप्रवृत्तीला आळा घालण्यासाठी महाराष्ट्र राज्य आदिवासी विकास महामंडळाच्या सहकार्याने व्दार वितरण व्यवस्था राबविली जाते. ही व्दार वितरण व्यवस्था प्रभावीपणे आदिवासी क्षेत्रामध्ये राबविण्यात यावी.

(चार) पावसाळयात दळण-वळणाची व्यवस्था विस्कळीत होते अशा आदिवासी गावांसाठी पावसाळयापूर्वीच पुरेसा धान्य साठा (प्रि मान्सून स्टॉकिंग) ठेवण्यात आलेला आहे याची खात्री करुन घेण्यात यावी.

५) खावटी कर्ज योजना

शासन परिपत्रक दिनांक २० एप्रिल, १९९४ अनुसार ज्या आदिवासी कुटुंबातील मुले कुपोषणाच्या ग्रेड-३ किंवा ४ मध्ये असतील अशा कुटुंबांची खावटी कर्जाची थकबाकी असली तरीसुध्दा त्या कुटुंबांना त्यांची थकबाकी माफ करुन त्यांना पुन्हा थकबाकीच्या प्रमाणात खावटी कर्ज मंजूर करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत. अशी कुटुंबे आदिवासी

सहकारी संस्थेचे सदस्य नसतील तर त्यांना अशा संस्थांचे सदस्य करुन घ्यावे. त्यासठी आवश्यक असलेली नोंदणी फी प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी न्युक्लिअस बजेट निधीतून भरावी. शासनाच्या दिनांक २० एप्रिल, १९९४ च्या परिपत्रकातील आदेश यापुढेसुध्दा तंतोतंत अंमलात राहतील.

६) धान्य कोष योजना

सध्या राज्यातील आदिवासी उपयोजना क्षेत्रात "खावटी कर्ज" योजना राबविण्यात येत आहे. या योजने अंतर्गत रुपये ४००/- या मर्यादेपर्यंत धान्यरुपाने आदिवासी शेतकरी/शेतमजूर यास कर्ज देण्यात येते. परंतु त्याची वसुली होत नाही किंवा वसुलीचे प्रमाण नगण्य आहे. ही बाब दृष्टीसमोर ठेवून तिला पर्याय म्हणून धान्य कोष योजना प्रस्तावित आहे. गावातील आदिवासी शेतकरी व इतर गावकरी अन्न-धान्याच्या संदर्भात आत्मनिर्भर व्हावेत हा धान्यकोष योजनेचा उद्देश आहे. या योजने अंतर्गत गाव पातळीवर सेवाभावी संस्थेमार्फत धान्य कोष योजना राबविली जाईल. धान्य कोष योजनेसंबंधी आवश्यक त्या सूचना/आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील.

७) वित्तीय व्यवस्था

(अ) नवसंजीवन योजना ही अनेक घटक कार्यक्रम समाविष्ट असलेली योजना आहे. अशा घटक कार्यक्रमांना दरवर्षी आदिवासी उपयोजनेमधून निधी मंजूर करण्यात येतो. हाच निधी नवसंजीवन योजनेखाली समाविष्ट असलेल्या घटक कार्यक्रमांसाठी वापरण्यात यावा. केवळ नवसंजीवन योजनेच्या नावाखाली स्वतंत्र निधी मंजूर करण्यात येणार नाही.

(आ) नवसंजीवन योजनेखाली होणारा खर्च वर उल्लेखिल्यानुसार घटक निहाय मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा आणि सर्व संबंधीत अंमलबजावणी अधिका-यांच्या कार्यालयांनी मंजूर निधी व झालेल्या खर्चाचा हिशेब तसेच योजनेचा प्रगतीविषयक अहवाल इत्यादीबाबतची माहिती संबंधित जिल्हाधिका-यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत निश्चितरित्या पाठवावी.

जिल्हाधिका-यांनी सदर योजनानिहाय माहिती संबंधित विभागाचे महसूल आयुक्त आणि आयुक्त (आदिवासी विकास), नाशिक यांना १५ तारखेपर्यंत पाठवावी. तसेच महसूल आयुक्त आणि आयुक्त (आदिवासी विकास), नाशिक यांनी एकत्रित अहवाल दरमहा आदिवासी विकास विभागाकडे २० तारखेपर्यंत निश्चितरित्या सादर करावा.

८) नवसंजीवन योजनेचे संनियंत्रण

(एक) नवसंजीवन योजनेचे संनियंत्रण या संज्ञेमध्ये पुढील बाबी समाविष्ट राहतील.

(क) घटक कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी होण्यासाठी कृती नियोजन आराखडा तयार करणे.

(ख) घटक कार्यक्रमाची अंमलबजावणी करतांना उद्‌भवणा-या अडचणी लक्षात घेऊन त्वरीत उपाययोजना करणे.

(ग) वेळोवेळी सर्व स्तरावर आढावा बैठक आयोजित करणे, त्यांचे इतिवृत्त तयार करणे व संबंधितांकडे पाठविणे.

(घ) महत्वाच्या बाबींचे नियोजन करणे उदा.पुरेशी तरतूद प्राप्त करुन घेणे, आवश्यकतेनुसार योग्य ते आदेश घेऊन नियम, अटी, मानके इत्यादी बाबी शिथिल करणे.

(च) नवसंजीवन योजनेची अंमलबजावणी होत असलेल्या गावी/स्थळी वेळोवेळी भेटी देऊन स्थानिक अधिका-यांना मार्गदर्शन करणे.

(दोन) नवसंजीवन योजनेचे सनियंत्रण स्तरनिहाय खालीलप्रमाणे करण्यात यावे :-

(१) घटक कार्यक्रमाची अंमलबजावणी करणा-या अधिका-यांनी त्यांच्या कार्यकक्षेत राबविण्यात येणा-या कार्यक्रमाच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीबाबत संनियंत्रण ठेवावे.

(२) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी त्यांच्या क्षेत्रातील सर्व घटक कार्यक्रमाची अंमलबजावणी करणा-या अधिका-यांसमवेत समन्वय ठेवावा व त्याबाबत संनियंत्रण ठेवावे.

(३) संबंधित जिल्हाधिकारी त्यांच्या जिल्हयातील जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हयाचे इतर संबंधित अधिकारी व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांच्या कार्यावर संनियंत्रण ठेवतील आणि संबंधितांना योग्य ते मार्गदर्शन करतील. अशारितीने जिल्हयाचे जिल्हाधिकारी हे नवसंजीवन योजनेबाबत मुख्य अंमलबजावणी अधिकारी म्हणून काम पाहातील.

(४) अपर आयुक्त, आदिवासी विकास हे त्यांच्या कार्यक्षेत्रातील जिल्हयांबाबत संनियंत्रण ठेवतील व संबंधित जिल्हाधिका-यांशी सातत्याने संपर्क ठेवतील तसेच संबंधित विभागीय आयुक्त आणि आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेशी ते सतत संपर्कात राहतील.

(५) विभागीय आयुक्त हे त्यांच्या कार्यक्षेत्राचे मुख्य संनियंत्रण अधिकारी म्हणून काम पाहातील व जिल्हयातील सर्व अंमलबजावणी अधिका-यांना योग्य ते मार्गदर्शन करतील.

(६) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक हे सर्व मुख्य संनियंत्रण अधिका-यांकडून प्राप्त झालेल्या माहितीचे संकलन करतील आणि घटक कार्यक्रमाशी निगडीत असलेल्या मंत्रालयीन प्रशासकीय विभाग आणि आदिवासी विकास विभाग यांचेशी समन्वय ठेवतील.

(तीन) नवसंजीवन योजनेच्या प्रभावी अंमलबजावणी संदर्भात शासनाने शासन परिपत्रक दिनांक २६ एप्रिल, १९९५ अन्वये राज्यपातळीवर आदिवासी विकास विभागात विशेष कक्ष उघडला आहे. त्याचप्रमाणे आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे कार्यालयात सुध्दा स्वतंत्र विशेष कक्ष उघडण्यात आला आहे. सर्व संबंधितांनी या दोन्ही विशेष कक्षाशी सातत्याने संपर्क ठेवावयाचा आहे.

(चार) नवसंजीवन योजनेमध्ये समाविष्ट केलेल्या सर्व घटक कार्यक्रमांची अंमलबजावणी, संनियंत्रण आणि योग्य तो समन्वय प्रभावीपणे व्हावा. या योजनेची अंमलबजावणी करत असतांना पावसाळयापूर्वी करावयाच्या उपाययोजनेसंबंधी शासनाने यापूर्वीच निर्गमित केलेल्या शासन परिपत्रक दिनांक २० एप्रिल, १९९४ व २६ मे,१९९४ मधील सर्व सूचना तंतोतंत पाळल्या जाव्यात.

(पाच) सचिव, आदिवासी विकास, सार्वजनिक आरोग्य, अन्न व नागरी पुरवठा, ग्राम विकास व ग्राम विकास व जलसंधारण (रो.ह.यो.) विभाग हे राज्यामध्ये वेळोवळी दौरा करुन स्थानिक अधिका-यांना मार्गदर्शन करतील. आवश्यकता वाटल्यास नवसंजीवन योजना चालू असलेल्या गावी प्रत्यक्ष भेटी देतील व कामाची पहाणी करतील.

९) नवसंजीवन योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीच्या संदर्भात सेवाभावी संघटना व उद्योजक यांनी तयारी दर्शविल्यास शासन त्यांचा सहभाग घेईल. म्हणून आदिवासी क्षेत्रात नावाजलेल्या सेवाभावी संस्थांचा व उद्योजकांचा या योजनेमध्ये सहभाग प्राप्त करुन घेण्याकरिता खास प्रयत्न करण्यात यावे.

१०) नवसंजीवन योजना राज्यामध्ये अत्यंत प्रभावीपणे राबविण्यासाठी सर्व अंमलबजावणी अधिकारी व समन्वय अधिकारी यांनी आपआपली कामे जबाबदारीने पार पाडावीत व ही योजना यशस्वी होण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही तत्परतेने करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( राजेंद्र सिंह )
सचिव,
आदिवासी विकास विभाग.